**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग येथे प्रथम वर्षाकरिता १०० विद्यार्थी प्रवेशास परवानगी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एमईडी-२०१६/प्र.क्र.२३१/१६/शिक्षण-१
९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक:- ११ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा**:- १) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र.एमईडी-२०१६/प्र.क्र.२३१/१६/ शिक्षण-१, दिनांक ०८डिसेंबर,२०२०.
२) राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NMC/UG/२०२०/ ००००२४/००९७१२, दिनांक १०.०२.२०२२.

**प्रस्तावना:-**

सिंधुदुर्ग येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित जिल्हा सामान्य रूग्णालयाचे श्रेणीवर्धन करून ५०० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आलेली आहे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या वैद्यकीय महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२१-२२ साठी केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून परवानगी दिलेली आहे. सबब, सदर महाविद्यालयास १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह शैक्षणिक वर्ष २०२१-२२ साठी विद्यार्थी प्रवेशित करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या वैद्यकीय महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२१-२२ साठी केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी विहीत अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सदर वैद्यकीय महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२१-२२ साठी १०० विद्यार्थी प्रवेशित करण्यासाठी पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून परवानगी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या वैद्यकीय महाविद्यालयातील विद्यार्थी प्रवेश क्षमता केंद्र शासनाने निर्धारित केल्यानुसार १०० इतकी राहील.
२) सदर अभ्यासक्रमास महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांचे संलग्निकरण प्राप्त करुन घेण्यात यावे व तद्नंतर प्रवेश करण्यात यावेत.
३) राज्य शासन/केंद्र शासन/मा.सर्वोच्च न्यायालय अथवा मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

४) केंद्र शासन, राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली व राज्य शासन यांनी वैद्यकीय अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे बंधनकारक राहील.

५) कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशीत करण्यात येऊ नये.

६) केंद्र शासनाने दिलेली परवानगी ही सन २०२१-२२ वर्षाकरिता असून तद्नंतर सदर परवानगीचे दरवर्षी नुतनीकरण करुन घेणे क्रमप्राप्त आहे. त्यानुसार विद्यार्थी प्रवेश करण्यापूर्वी केंद्र शासनाच्या तसेच त्याआधारे राज्य शासनाच्या परवानगीचे नुतनीकरण करुन घेणे बंधनकारक राहील.

७) सदर शासन निर्णय हा राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये दिलेली परवानगी तसेच महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४ नुसार शासनास प्रदत्त अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१११७२४४३७८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL

Digitally signed by SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d32b061d22e577cf43207f6a86cadc4ce1798644845edd3b3fb5ef54c3051c62, pseudonym=FBB5CB78D48FD59FDB880E6E036B604B5888852F, serialNumber=30EC04F686F0E87515C68A42BC5DF9353C8AF939EF1A35539184495DA3E943C6, cn=SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL
Date: 2022.02.11 17:36:30 +05'30'

**(डॉ. श्रीनिवास पुं. कोतवाल)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
६) सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
८) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
९) सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई.
१३) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.

१४) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.

१५) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.

१६) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग.

१७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.

१८) जिल्हा शल्यचिकित्सक, जि. सिंधुदुर्ग.

१९) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.

२०) सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय.

२१) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ९ वा मजला, न्य एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के. नायक मार्ग, फोर्ट-४००००१.

२२) सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, शासकीय तंत्रज्ञान इमारत, ३०५, ३रा मजला, ४९, खेरवाडी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

२३) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी , वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४) निवडनस्ती (शिक्षण-१).